**राज्य आपत्ती प्रतिसाद दलाबाबतचे निर्णय घेण्याबाबतचे अधिकार पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांना प्रदान करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्रमांक :- डीएमयू-२०११/प्र.क्र.२२१/आव्यप्र-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १०.०७.२०१७

वाचा :- १) शासन निर्णय क्रमांक :- डीएमयू-२०११/प्र.क्र.२२१/आव्यप्र-१, दि.३०.०८.२०१४
२) शासन निर्णय क्रमांक :- डीएमयू-२०११/प्र.क्र.२२१/आव्यप्र-१, दि. १९.०५.२०१६

**प्रस्तावना :-**

संदर्भाधिन शासन निर्णयान्वये राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद दलाच्या धर्तीवर राज्यात राज्य आपत्ती प्रतिसाद दलाच्या २ स्वतंत्र कंपन्याची स्थापना करण्यात आली आहे. त्यासाठी पोलीस महासंचालक यांच्या आस्थापनेवर एकूण ४२८ अधिकारी / कर्मचाऱ्यांची पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर २ कंपन्यापैकी १ कंपनी नागपूर आणि १ कंपनी धुळे येथे कार्यरत आहे. राज्य आपत्ती प्रतिसाद दलाची आस्थापना आणि अनुषंगिकबाबी हाताळण्याचे अधिकार पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांना आहेत.

वरील कंपन्यामध्ये राज्य राखीव पोलीस बलातून प्रतिनियुक्तीने एकूण २८८ पोलीस अधिकारी / कर्मचारी नियुक्त करण्यात आले आहेत. या अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे मुलभूत प्रशिक्षण राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद दलाकडून पूर्ण झाले आहे. या दलास साधनसामुग्री उपलब्ध करणे आवश्यक आहे.

राज्य आपत्ती प्रतिसाद दलासाठी लागणारा निधी, साधनसामुग्री (साहित्य, प्रशिक्षण, वाहन, गणवेश इ.) आस्थापनाविषयक बाबी / या दलाची नियुक्ती, अर्थसंकल्पीय तरतूद इत्यादीबाबतचे सर्व निर्णय घेण्याचे अधिकार आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ च्या कलम २० (१) नुसार मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या राज्य कार्यकारी समितीस देण्यात आले आहेत राज्य कार्यकारी समितीस देण्यात आलेले वरील अधिकार पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांना प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य आपत्ती प्रतिसाद दलासाठी लागणारा निधी, साधनसामुग्री (साहित्य, प्रशिक्षण, वाहन, गणवेश, इत्यादी), आस्थापना विषयकबाबी, या दलाची नियुक्ती, अर्थसंकल्पीय तरतूद याबाबतचे सर्व निर्णय घेण्याचे राज्य कार्यकारी समितीस असलेले अधिकार पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांना प्रदान करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. संदर्भाधिन शासन निर्णयातील इतर तरतूदीत कोणताही बदल नाही.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७१०१४०९१११६१९ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrirang
Shripati Gholap

Digitally signed by Shrirang Shripati Gholap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DMU/R AND R, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e1b6e289fe7dcde27c972916398d8220a134ed8ebf6439e54d1927c5c4b28bec, cn=Shrirang Shripati Gholap
Date: 2017.07.10 14:07:37 +05'30'

**(श्रीरंग घोलप)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रती :-**

१) अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) महासंचालक, एन.डी.आर.एफ., पुणे.
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र, मुंबई.
४) सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव, पशुसंवर्धन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) महासंचालक, यशदा, पुणे.
७) अपर पोलीस महासंचालक, गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य पुणे.
८) अपर पोलीस महासंचालक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९) संचालक व अपर पोलीस महासंचालक, बिनतारी संदेश विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) सर्व विभागीय आयुक्त,
११) विशेष पोलीस महानिरिक्षक, राज्य राखीव पोलीस बल, पुणे/ नागपूर.
१२) समादेश, राज्य राखीव पोलीस बल, गट क्र ४, नागपूर / गट क्र ६, धुळे,
१३) निवड नस्ती, आव्यप्र-१